**वन संपतीचे सर्वेक्षण या योजनेत्तर योजनेखालील अस्थायी पदे सन २०२३-२४ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- टिआरएस-०२/२०२३/प्र.क्र.७५/फ-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-०५ एप्रिल, २०२३

वाचा :- १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. टिआरएस-०३/२०२२/प्र.क्र.७१/फ-६, दि.१७.३.२०२२
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. टिआरएस-०३/२०२२/प्र.क्र.७१/फ-६, दि.०२.९.२०२२
३) उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) कार्यालय, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/ योजनेत्तर/प्रक्र १३(२२-२३)/२२२, दि.१३.०२.२०२३
४) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३

**शासन निर्णय :-**

वन संपतीचे सर्वेक्षण या योजनेत्तर योजनेखालील ६३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत **संदर्भ क्र.१** येथील शासन निर्णयाअन्वये तसेच दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत **संदर्भ क्र.२** येथील शासन निर्णयाअन्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. आता **संदर्भ क्र.३** येथील उपवनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) कार्यालय, नागपूर यांचेकडून वन संपतीचे सर्वेक्षण या योजनेत्तर योजनेखालील ६३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.२८.०२.२०२४ पर्यंत मुदवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. वित्त विभागाच्या दि.०८.२.२०२३ च्या शासन निर्णयाअन्वये अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचा अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेले आहेत.

३. वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारानुसार व उपवनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) कार्यालय, नागपूर यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार, वन संपतीचे सर्वेक्षण या योजनेत्तर योजनेखालील या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र **अ** येथील एकूण ६३ अस्थायी पदे दि.१.३.२०२३ ते दि.३१.८.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर ६३ अस्थायी पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ -वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०१ वनसंधारण विकास व पुननिर्मीती, (०४) कार्य आयोजनेमध्ये सुधारणा व तयारी, (०४)(०१) कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी (२४०६०१४९), ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक २०२३०४०६१८४९१५५११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: CN = PINGALE BHANUDAS NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2023.04.06 18:54:10 +05'30'

**(भा.ना.पिंगळे)**
**उप सचिव (वने), महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व) .
३) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) .
४)) सर्व वनसंरक्षक (प्रादेशिक).
५) मुख्य वनसांख्यिकी, प्रधान मुख्य वनसंरक्षक यांचे कार्यालय, नागपूर.
६) वनसांख्यिकी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) वित्त विभाग, व्यय-१०/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/अमरावती/गडचिरोली/चंद्रपूर.
११) कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती, कार्यासन फ-६, महसूल वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- टिआरएस-०२/२०२३/प्र.क्र.७५ /फ-६
दिनांक :-०५ एप्रिल २०२३ चे सहपत्र.

**विवरणपत्र-अ**

| अ. क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १. | विभागीय वन अधिकारी | १ |
| २. | उप विभागीय वन अधिकारी | १ |
| ३. | वनक्षेत्रपाल | २ |
| ४. | वनपाल | ३६ |
| ५. | वनसर्व्हेक्षक | १० |
| | वनरक्षक | ६ |
| ६. | लिपीक-नि-टंकलेखक | ३ |
| ८. | जीपचालक | २ |
| ९. | शिपाई | २ |
| | एकुण पदे | ६३ |

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: CN = PINGALE BHANUDAS NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2023.04.06 18:54:29 +05'30'

**(भा.ना.पिंगळे)**
**उप सचिव (वने), महसूल व वन विभाग**